ई- साहित्य प्रकाशन हरि ओम २ मार्च, २००९ (अंक १५)

# हिरवी बोली : विशेषांक

## कविश्रेष्ठ पद्मश्री ना. धों. महानोर यांना 'जनस्थान' पुरस्कार








**संपादक**
अहं ब्रह्मास्मि ( पुणे )

**अतिथी संपादक**
श्री. श्रीपाद कोठे ( नागपूर )

**सहसंपादक**
सोनाली घाटपांडे ( पुणे )
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
रेणूका रेपाळ ( अमेरिका )
सुरुचि नाईक ( नागपूर )
आनंद माने ( सोलापूर )
नाम गुम जायेगा ( ठाणे )
सचिन काकडे ( मुंबई )




**....ह्या अंकात वाचा....**



आपल्या हिरव्या बोलीने कवितेचे शिवार समृध्द करणारे 'ह्या नभाने ह्या भुईला दान द्यावे आणि या मातीतून चैतन्य गावे' अशी स्वप्ने रंगवितांनाच मानवी कल्याणासाठी प्रार्थना करणारे,निसर्गाबरोबरच माणसाशी तादात्म्य पावलेले प्रख्यात निसर्गकवी ना धो महानोर ह्यांना कुसुमाग्रज प्रतिष्ठानच्या वतीने कवीश्रेष्ठ कुसुमाग्रजांच्या जयंतीचे औचित्य साधत पॉप्युलर प्रकाशनचे संस्थापक डॉ.रामदास भटकळ यांनी जनस्थान पुरस्कार प्रदान केला.

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. **netaksharee@gmail.com**



या शेताने लळा लाविला असा असा की
सुख-दु:खाला परस्परांशी हसलो-रडलो
आता तर हा जीवच अवघा असा जखडला
की त्याच्या हिरव्या बोलीचा शब्द जहालो

अस्सल मराठी मातीतल्या हिरव्या बोलीचा हा हुंकार उमटला आहे **श्री ना. धो. महानोर** यांच्या लेखणीतून. औरंगाबाद जिल्ह्यातील **पळसखेडे** नावाच्या खेडेगावात १६ **सप्टेंबर** १९४२ या दिवशी त्यांचा जन्म झाला.

फक्त एकच वर्ष महाविद्यालयात गेलेला हा माणूस शेती-शिवारांमधे रमणारा. दाहीदिशांनी खुणावणारा सारा निसर्ग त्यांना लोभवत होता आणि निसर्गात रमता-रमता सहजपणे मातीतुन अंकुर फुटावा तशी कविता तरारली.

या नभाने या भुईला दान द्यावे
आणि या मातीतूनी चैतन्य गावे
कोणती पुण्ये अशी येती फळाला
जोंधळयाला चांदणे लगडून जावे

या नभाने या भुईला दान द्यावे
आणि माझ्या पापणीला पूर यावे
पाहता सुगंध कांति सांडलेली
पाखरांशी खेळ मी मांडून गावे

गुंतलेले प्राण या रानात माझे
फाटकी ही झोपडी काळीज माझे
मी असा आनंदून बेहोष होता
शब्दगंधे तू मला बाहूत घ्यावे

रानात प्राण गुंतलेल्या या कविचा **रानातल्या कविता** हा पहिला कवितासंग्रह १९६७ साली प्रसिद्ध झाला आणि निसर्गकवितांच्या विश्वाला एक अनोखे परिमाण लाभले.

ग्रामीण जीवनातल्या दु:खांची व कष्टांची जाणीव असलेल्या, तसेच आणि तिथल्या मातीचा, झाडा-पानांचा कण नि कण ओळखणा-या या कविने मराठी कवितेत एक मुक्त खळाळणारा प्रवाह सोडून नवचैतन्य निर्माण केले.

सतत निर्मिती करणा-या भूमीचे शेतक-याला भारी अप्रूप
त्या खुल्या मातीचा दरवळ कवितेला प्रथमच येऊ लागला.
त्यापूर्वी **यशवंत, सोपानदेव चौधरी, केशवसुत, ग. ल. ठोकळ** अशा अनेक कविंनी कवितेत ग्रामीण निसर्ग आणला होता, **बा. भ. बोरकर, बालकवि, ना. घ. देशपांडे, मंगेश पाडगावकर** यांनीही निसर्गाची अनेक रुपे रेखाटली होती.

पण तापलेल्या मातीवर पहिला पाऊस पडल्यावर ज्या प्रकारे आसमंत सुगंधाने दरवळून मनाला धुंद करतो, त्याच प्रकारे महानोरांची कविता मुक्तपणे गंधाळली.

फुलात न्हाली पहाट ओली,
क्षितिजावरती चंद्र झुले
नभात भुललया केशरियाचे
रंग फुलांवर ओघळले

रंग फुलांवर ओघळतांना
असे जुईला लदबदले
गालावरचे निळे गोंदणे
पदराभवती घुटमळले

निळया तिच्या डोळयांत कथाई,
कुणाकुणाच्या आठवणी
एक झोपडी साक्षीमधली
करीत बसली साठवणी

अशी झोपडी बोलघेवडी
पांथस्थाचा पाय अडे दाट
जोंधळया रानामधला
हुरडा पाहून भूल पडे

आज तिने कुठल्या सजणाला
दूर नभातुन बोलविले
भरात येउनी नग्न शरीरी
उघड्यावरती भोग दिले

काचोळीची गाठ सावरित
हळू तयाला सांगितले
तिचियापोटी पाचघडीचे
लखख चांदणे अवघडले

फुलात न्हाली पहाट ओली,
कळीत केशर साकळते
गंधवतीच्या मनातराजस
एक पाखरु भिरभिरते



आत्यंतिक संवेदनक्षमता असलेला हा शेतकरी कवि आपल्या लेखणीमधून देहाच्या सगळया संवेदना उत्कटपणे व्यक्त करत निसर्गाचे सौंदर्य कागदावर शब्दरुपाने उतरवत होता.

निसर्गकवितांप्रमाणेच त्यांनी लिहिलेल्या मनमोकळया व उत्कट श्रृंगारकवितांनी सुद्धा रसिकांची अंतःकरणे जिंकून घेतली.

नैतिकतेचा दांभिक पडदा फाडून, निसर्ग सौंदर्य आणि स्त्री-पुरुषांमधील नैसर्गीक शारिरीक आकर्षण एका अनोख्या पद्धतीने त्यांनी कवितेतून मांडले.



घन ओथंबून येती, बनात राघू भिरभिरती
पंखा वरती सर ओघळती, झाडांतून झडझडती

घन ओथंबून झरती, नदीस सागर भरती
डोंगर लाटा वेढित वाटा, वेढित मजला नेती

घन ओथंबून आले पिकात केसर ओले
आडोशाला जरा बाजूला, साजण छैल-छ्बीला
घन होऊन बिलगला, घन होऊन बिलगला

पावसासारखे सरसरत येणारे असे बोलीभाषेतील शब्द, सहज गोडवा, लय आणि प्रवाहीपणा हे विशेष गुण त्यांच्या कवितेत ठळकपणे दिसून येतात.

नेमकेपणा आणि सूचकता यामुळे त्यांच्या कवितांची विलोभनीयता वाढलेली आहे. त्यांनी कवितेच्या लयीबाबत अनेक प्रयोग केलेले दिसून येतात. उदाहरणादाखल -

विस्तीर्ण नदीचा काठ, पसरली दाट
फुलांची नक्षी
गर्दीत हरवली वाट, कुणी सैराट
बावरा पक्षी

पाण्यात एक सावली, हले बाहुली
थरकते ऊन
ही माल्हन म्हणते गान, चंद्र माळून
बहकते रान

झाडीत हूल बिथरते, गंध विखरते
फुलांची नक्षी
गर्दीत हरवली वाट, कुणी सन्नाट
बावरा पक्षी



**नभ उतरू आलं, मी रात टाकली, चांद केवड्याची रात, असं एखादं पाखरू वेल्हाळ, आज उदास उदास गं** यांसारखी वर्षानुवर्ष मनात रुंजी घालणारी दाणेदार मोत्यांसारखी गीते असोत, की **लाल पैठणी रंग माझ्या चोळीला, राजसा जवळी जरा बसा** अशा दळदार लावण्या असोत, त्यांनी नेहमीच ग्रामीण लोकजीवनाशी व लोकसाहित्याशी नाते जपलेले दिसून येते.



अवेळीच केंव्हा दाटला अंधार
तिच्या गळा जड झाले काळे सर
एकदा मी तिच्या डोळयात पाहिले
हासताना नभ कलून गेलेले
पुन्हा मी पाहिले तिला अंगभर
तिच्या काचोळीला चांदण्याचा जर
आणि माझा मला पडला विसर
मिठीत थरके भरातील ज्वार
कितीक दिसांनी पुन्हा ती भेटली
तिच्या ओटी कुण्या राव्याची साऊली
तिच्या डोळियात जरा मी पाहिले
काजळात चंद्र बुडून गेले

यासारख्या कवितेमध्ये केवळ श्रृंगार रस नाही, तर एक चिरंतन वेदना असल्याचे जाणवते.

वयाच्या पन्नाशीनंतर ते आपल्या सौंदर्य-आस्वादकाच्या भुमिकेतून बाहेर पडले.
आता ते एका वेदनापर्वात, प्रार्थनापर्वात उभे आहेत पण शब्द मात्र अजुनही हिरव्या बोलीचाच आहे.
या सौंदर्योपासक कवीला शेतक-यांचे नेमके दुःख काय आहे, व त्याची ही दैन्यावस्था का याची स्पष्ट जाणिव आहे.
त्यांच्या कवितेत **जोंधळयाला चांदणे लगडून आले** तो काळ आता राहिला नाही.
आता शेतक-यांच्या दुःखाने **खेडोपाडी मोडलेल्या कुणब्यांना गर्भवास, तुका उडून जाताना देहू निरभ्र उदास** असे म्हणत, विधान परिषदेत आमदार म्हणून काम करताना त्यांनी शेतक-यांच्या दुःखांना वाचा फोडली.
पीक, पाणी, राजकारणाने गढुळ केलेले खेड्यातील वातावरण अशा समस्यांबद्दल कळवळयाने बोलत राहिले.
आपल्या हिरव्या बोलीला प्रार्थनेची शक्ती मिळवण्यासाठी हा कवी आता गोदातीरिच्या पुण्यभुमीत तप करत आहे.

**श्री ना धों महानोर यांचे साहित्य -**

रानातल्या कविता (१९६७), वही (१९७०), पावसाळी कविता (१९८२), प्रार्थना दयाघना (१९९०), पक्ष्यांचे लक्ष थवे, अजिंठा (खंडकाव्य, १९८४), पानझड, तिची कहाणी, पळसखेडची गाणी (१९८२), त्या आठवणींचा झोका, गंगा वाहु दे निर्मळ, दिवेलागणीची वेळ, जगाला प्रेम अर्पावे, पुन्हा कविता, पुन्हा एकदा कविता ही १९४५ ते १९८० या काळातल्या निवडक मराठी कवितेची संपादने, गांधारी (१९८२) ही कादंबरी, गपसप(१९७२) आणि गावाकडल्या गोष्टी (१९८१ ऐशी कळवळयाचि जाती (१९९७) हा व्यक्तिचित्रात्मक ललितलेखांचा संग्रह तसेच यशवंतराव चव्हाण यांचे मौलिक विचार (१९८९) हे इतर लेखन
१९७८ साली त्यांची विधान परिषदेवर नियुक्ति करण्यात आली.

**पुरस्कार** - मृत्युंजय, जनस्थान, पद्मश्री,जनस्थान अशा अनेक पुरस्कारांनी त्यांना सन्मानित केले गेले आहे.

ना धों प्रमाणेच हिरव्या बोलीची भाषा जाणणारे-बोलणारे नव्या पिढीतील कित्येक कवी आज त्यांचा वारसा दमदारपणे पुढे चालवत आहेत

जरी हे कवी अद्याप प्रसिद्धीच्या झोतात आलेले नसले, तरी त्यांच्या कवितादेखील तीच हिरवी बोली बोलतात

**ऑरकुट वरील Marathi kavita-मराठी कविता** आणि **काव्यांजली** या कवितांच्या कम्युनिटीवर असे अनेक कवी सातत्याने कविता पोस्ट करत असतात

**अशा हजारो कवितांमधील काही कविता या निमित्ताने**

**रसिकांसमोर सादर करत आहोत**





आकाशातील वीज चमकुनी,
स्वच्छ दिसावा आसमंत हा
तशी मला ती दिसली क्षणभर,
वळणावरती उभी कधीची
माझ्यासाठी, माझ्यासाठी
वीज संपली, पुन्हा दाटली, रात्र काजळी
पण आता निश्चिंत मनाने पुढे चाललो
कारण आता कळले आहे
वळणावरचे स्वच्छ निळेपण
वळणावरचे स्वच्छ निळेपण

**-- समीर (गुलशनाबादी)**

पिंपळा वरून पिंगळा बोलला
सपान चांदाचा निजल्या रातीला
पानात पिंपळ चांदण हासला
डोहात आसरा झिम्माड नाचल्या
वेळूच्या बनात माडाच्या कानात,
वाराहि धावून बोंबले जोरात
गाभ्यास रातीच्या जुगला चांदुल्या
रातीनं काढल्या आभाळी रांगोल्या
आंब्याच्या राईत राघूच्या ढोलीत,
डोल्यात मैनेच्या चांदना शारद
चंदेरी सपान डोल्याच्या शिपीत,
शिवरी कणीस कापते दंवात
सागरी शिंपीत चांदुल्या बंदीत
मैनेच्या देहात राघूच्या पंखात
पिंपळा वरुन पिंगळा बोलला
नाहाला दंवात रातीचा चांदुल्या

**-- अनुराग कौशिक**



वेणी मोहक फुलांचि
रोज माळून रहाते
पोर दूरच्या कुनाची
रोज वाटुली पहाते

तुला भेटाया येईन
म्हने सांजच्या वेळेला
तेंव्हा पासून सांजची
वेळ उदास रहाते

आजची बी सांज गेली
उद्या सांजला येईल

उद्या सांजला येईल
मनी हेच गानं गाते
पोर दुरच्या कुनाची
रोज वाटुली पहाते

**--- तुषार जोशी, नागपूर**

रानभुलीने मी रानात हरवले
कसे सांगू कसे हरित डंख झाले

विषारी शिकारी करवंदीत दडलेले
कापूस धुक्यात पथ होते हरवले

विळख्यात त्याने घट्ट करकचले
मोगरा कळयांचे गजरे झट्ट तुटले

कुजबुजणे पाखरांचे पानोपानी पसरले
डोह निळेहिरवे मत्स्यतरंगी शहारले

झुळझुळते रेशम पाचोळयांवर चुरले
सुगंधी बेहोशीत नयन अर्धे मिटले

विषघट पाझरले अंतर्यामी रुजले
सायंनभी चांदणीचे गार हुंदके सुटले

**--- स्वप्ना कोल्हे**



आतुर हे मोर, नभी मेघांची ही रांग
मनी तुझ्या आहे काय खरं खरं सांग

इवल्याश्या देहावर किती भार सोसू
अंगी चांदण्याची पुटं आता कशी पुसू
रातीचे हे मोल मला अलगद कळे
अत्तरात जीव ओला हलकेच जळे

गुलाबाच्या दारावर भ्रमराची थाप
उगा आलो प्रेमदेशी फुकटचा ताप
अवघड वळणी या देऊनीया साथ
ओठातून कानामध्ये करुया ना बात

जीव झाला अनावर नभात या फिरे
मन झाले ठार वेडे पिसापरी झुरे
टपटप सरींना या लाऊनिया धार
जसे बोलशील तसे वाग एकवार

शिंपल्याची व्यथा जुनी मोतीयाचे मौन
बोलायचे काहीतरी हातचे राखून
नको आता असे करु उमलून जा ना
उरातली धडधड थांबऊन जा ना

आतुर हे मोर, नभी मेघांची ही रांग
मनी तुझ्या आहे काय खरं खरं सांग

**--- चिराग पत्की**



नभी चांदण्यांच्या सवे, रात जागते आभाळ
शाल ओलेत्या धुक्याची, रोज मागते सकाळ

मेघ करिती ओंजळ, भास ओला विणायला
धागा खरा अंधाराचा, वारा फक्त म्हणायला

थेंब थेंब विणताना, नशा उगा देते हुल
नजरेस त्याच जुन्या, आठवांचि पुन्हा भुल

भुलताना होतो डाव, अंधारतो सारा गाव
अंधाराच्या मागोमाग, शब्द ओले, ओले घाव

उरी नाव जपताना, सुचु लागते ही माळ
नभी चांदण्यांच्या सवे, रात जागते आभाळ

अशी पहाटेच्या अंगी, नभ पांघरतो शाल
सुरवेड्या सावल्यांची, जागी ठेवतो मशाल

खरा शोभुन दिसतो, तसा हार तिच्या गळा
दाट शालीस लागतो, तव किरणांचा लळा

तीहि गाते वाऱ्यावरी, रान सैरभैर होते
पानातुनी सळसळ, गुज मनभर होते

असे नादावते मन, मन फिरे रानोमाळ
नभी चांदण्यांच्या सवे, रात जागते आभाळ

**--- सचिन काकडे (हा खेळ सावल्यांचा)**



फांद्या तुझ्या-माझ्या जरी अंतर राखती
मुळे तुझी-माझी एकमेका बिलगती

पानांवर माझ्या नाही तुझ्यापरी नक्षी
खांद्यावर तुझ्या येती निराळेच पक्षी
गाणी गाताना तयांचे सूर मिसळती
मुळे तुझी-माझी एकमेका बिलगती

वादळाचा फेरा येता झुकतो मी फार
ताठ उभे राहुनिया सोसते तू वार
पावसाच्या धारा माझे डोळे ओलावती
मुळे तुझी-माझी एकमेका बिलगती

सळसळ होता कधी माझ्या काळजात
समजते खास तुला माझे ते गुपित
पाठविशी काही फुले वा-याच्या सोबती
मुळे तुझी-माझी एकमेका बिलगती

**--- अहं ब्रह्मास्मि**



हे आकाश
हे ढग
हे धुकं
दिसतात मऊ मऊ सॉफ्ट
खरंच असतात का पण ?
कारण आपटले की विजा कोसळतात.
तापले की इस्कोटी वादळं फुत्कारतात.
आणि उधाणले की ध्वस्त करतात. . .
सगळी स्वप्नं.

यांच्या या मऊपणामागे दडलेलं
अक्राळ-विक्राळ वास्तव.
यांच्या या थंडपणामागे दडलेला संतप्त विस्तव
मी हवाली होतो त्यांच्या. . . . विश्वासाने
त्यांचं शांतीप्रेम अन त्यांची तुफानी शक्ती
यांना शरण जातो.
एक कतरा बनतो त्यांच्या सांदीकोप-यातला
एक शुन्य बनतो.
मस्त, सुस्त, शांत, निरव, सुशेगात. . .
एक जलभरला थंड थंड गार ढग बनतो.
(आत एक विजेचा लोळ सामावलेला)

**--- नाम गुम जायेगा**



बापुना डोयातुन माये पावसानी वाट
तान-भुक हरपुन बापु ढगाले पहात
वावरात पेरलेलं माये जवाराचं पीक
आसु बापुना डोयाले मना जीव कासावीस

माये इठ्ठल गं तुना कसा पावता पाईना
काया रंगबी ढगाले कसा चढता चढीना ?
निस्ता पिवळट झाला वावराचा कवडसा
हिरवट रंग कसा माये दिसता दिसेना ?

आज घाम लई येतो वर चिन्ह पावसानी
वारा गातु कशी ओवी, माये तुझ्याच मुखानी
पहिलाच थेंब माये गेला बापुच्या वठाशी
बापु पितुया पावुस जणु चातक उपाशी

आज नाचु दे गा माये, वावराच्या चिखुलात
वावरातुन व्हातया काया पाण्याचं अत्तर
काल इचारला व्हता माये प्रश्न इठ्ठलाला
आज पावुस धाडुन त्यानी दिलया उत्तर

--- संतोष बडगुजर

ओढुन घे पदर उघड्या स्तनावरी
घुटमळत असतात बुभुक्षित नजरी।

लाज ठेव झाकुनी काचेची तुझी जात
नको न्हाउस उघड्यावर कुणी करेल गं घात।

सीतेला राम होता कोण तुला वाचवील?
अनावृत्त शरिराचे गंध वारा शोषुन घेईल।

सजण परदेशी नको रात्रीस थारा
चुकुन उघडता कवाड तनुशी झोंबेल वारा।

आबरुचा आरसा तूच जपावास
जोर प्रवाही पाण्यामधे घेतील मगरी ग्रास।

मनातील ठिणग्यांना राखून ठेव पौर्णिमेसाठी
चुकुन घसरता पाय काटे माळशील माथी।

हुंगेल सजण परदेशी ताटवे नवथर फुलांचे
डोईवर पदर घेऊनी रक्षण कर कुलाचे।

कळपसुटल्या हरीणीला गवताचाही धाक
डोईवरल्या फांदीखाली चालताना थोडी वाक।

चार दिवसांचा विटाळ चुकऊ नकोस बाई
रात चुकऊन सजण येईल तुझ्या शेजेवरी।

डागामधला डाग त्याला डागऊ नकोस
मातीत पडल्या कुंकवास लाव निर्धाराने कपाळास।
**--- विजयकुमार**



**अतिथी संपादकांविषयी थोडंसं -**



या अंकाचे अतिथी संपादक श्री. श्रीपाद कोठे यांचे वास्तव्य नागपूर येथे असते.

लेखन, पत्रकारिता व सामाजिक कार्यात रस.

सुमारे १८ वर्षे पत्रकारिता केली, त्यापैकी दैनिक लोकसत्ता मधे अनेक वर्षे मुख्य उपसंपादक या पदावर काम केले.

नोकरीचा राजीनामा दिल्यानंतर शब्दसखा मासिकाची प्रबंध-संपादक म्हणुन जबाबदारी सांभाळली.

शेकडो लेख व भाषणांच्या माध्यमातून समाजाला काही देण्याचा सातत्याने प्रयत्न करत असतात.

त्यांनी सुमारे डझनभर विशेषांकांचे संपादन केलेले आहे.

त्यांना लेखनासाठी आणि शोध-पत्रकारितेसाठी पुरस्कार प्राप्त झालेला आहे.

मराठीचे आद्य-कवी मुकुंदराज यांच्या समाधी स्थळी (आम्भोरा येथे) आयोजित केलेल्या काव्योत्सवाचे संयोजन श्रीपादजींनी केलेले आहे.

संत मीराबाई यांच्या ४०० व्या जयंतीनिमित्त शालेय विद्यार्थ्यांसाठी आयोजित केलेल्या, वर्षभर चाललेल्या कथामालेचे संयोजक म्हणुन त्यांनी काम केलेले आहे.

संस्कार भारती या अखिल भारतीय संघटनेच्या रौप्य महोत्सवानिमित्त आयोजित कलासाधक संगमाचे संयोजक पद सुद्धा त्यांनी भुषविले आहे.

तसेच सुमारे १४ वर्षे संस्कार भारतीमध्ये प्रचार-प्रसार प्रमुख, साहित्य विभाग प्रमुख, संघटन मंत्री, महामंत्री अशी पदे सांभाळलेली आहेत.

अज्ञाताच्या महाद्वारातुन बाहेर पडलो
असीम ऊर्जेसह
अनादि जिगिषेने
अथांग सागरात झोकून दिले,
अनाम बंधने स्वीकारून
अकारणच पोहत राहिलो
अज्ञेयाचा छंद घेऊन
अनामिक संघर्ष केले,
अनिर्बंध क्रौ-याला
असाध्य प्रेमाने मात दिली,
अगोचर कोमलतेची
असफल आहुति दिली,
अनिमिष निमिषांचा
अगाध ध्यास घेतला,
अतृप्तिची शाल पांघरून
अखंडाची चैतन्यशलाका उजळली
अव्यक्ताची खिल्ली उडवित
अज्ञानाची मशाल पाजळली,
अर्ध्यावरून नजर वळवली
अनंत योजने दूर होतो
आरंभाच्या क्षणापासून,
आता फक्त प्रतीक्षा
असंभवाच्या गर्भसंभवाची
अप्राप्शी. . . . .!!

**--- श्रीपाद कोठे**

शुभं भवतु